**५:४५:५० या अर्थसहाय्याच्या आकृतीबंधानुसार सुधारित प्रकल्प अहवालास मान्यता देण्याबाबत.- लोटस को-ऑप स्पिनिंग मिल लि. इचलकरंजी, जि.कोल्हापूर.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : प्रकल्प- ३३२३/प्र.क्र.४०/टेक्स१ (अ)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २३ ऑगस्ट, २०२३.

वाचा :-

१. शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-२१९३/प्र.क्र.१८६/टेक्स-१, दि.११.०८.१९९३.
२. शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-११९७/प्र.क्र.१९३/टेक्स-१, दि.२४.३.१९९९.
३. शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-१२००/प्र.क्र.१५३/टेक्स-१, दि.१३.६.२०००.
४. शासन निर्णय,सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-११०८/प्र.क्र.९१/टेक्स-१(अ), दि.३०.०६.२०११.
५.शासन निर्णय, सहकार पणन व वस्त्रोद्योगविभाग क्र.सूतगि-३३१६/प्र.क्र.८१/टेक्स-१(अ), दि.१०.०७.२०१७.
६. शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.धोरण-२०१७/प्र.क्र.६/टेक्स-५, दि.१५.०२.२०१८.
७. शासन निर्णय,सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.प्रकल्प-१२२३/प्र.क्र.८/टेक्स-१ (ब), दि.१३.३.२०२३
८.आयुक्त,वस्त्रोद्योग,नागपूर यांचे पत्र क्र.कार्या ६(१)/सूतगि/लोटस प्रकल्प अह./१७३९ /२०२३, दिनांक २०.३.२०२३.
९. शासन पत्र, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र: संकीर्ण-३१२२/प्र.क्र.११/टेक्स १(ब), दिनांक ३१.५.२०२३.
१०. शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.: धोरण-२०२३/प्र.क्र.८१/टेक्स-५ , दिनांक ०२.०६.२०२३.
११. शासन निर्णय, समक्रमांक दिनांक ०८.०६.२०२३.
१२. शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.: सूतगि-३३१८/प्र.क्र.४/टेक्स-१(अ) , दिनांक २७.०६.२०२३.
१३. आयुक्त,वस्त्रोद्योग,नागपूर यांचे पत्र क्र.कार्या ६(१)/सूतगि/लोटस प्रकल्प अहवाल/ ३७८१/२०२३, दिनांक ०७.०८.२०२३.

**प्रस्तावना :-**

लोटस को-ऑप स्पिनिंग मिल लि. इचलकरंजी, जि.कोल्हापूर या सूतगिरणीची नोंदणी दि.२४.०६.१९९३ रोजी करण्यात आली असून तिचा नोंदणी क्रमांक एसएएन/पीआरपी/ऐ/डिएच-१९ असा आहे. सूतगिरणीचे कार्यक्षेत्र सांगली व कोल्हापूर जिल्हयापूरते मर्यादित आहे. शासन निर्णय दिनांक १५.०३.२०१८ अन्वये सूतगिरणीचा आठव्या पंचवार्षिक योजनेत समावेश करुन शासकीय अर्थसहाय्यासाठी निवड करण्यात आली होती. वस्त्रोद्योग धोरण २०१८-२०२३ चे वित्तीय आकृतीबंधानुसार सदर सहकारी सूतगिरणीस शासकीय भागभांडवल १०:३०:६० प्रमाणे रु.६१७४.२४ लाख प्रकल्प किंमतीस शासन निर्णय दिनांक ३१.३.२०१८ अन्वये मान्यता दिलेली आहे.

२. महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ, मुंबई यांचेकडून २५५३६ चात्यांचा प्रो रेटा पद्धतीने रु.८०९०.०० लाख इतक्या किमतीचा प्रकल्प अहवाल तयार करुन घेतला असून आयुक्त वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी दि.२०.०३.२०२३ रोजीच्या पत्रान्वये सदर प्रकल्प अहवाल सुकाणू समितीच्या मंजूरीसाठी शासनास सादर केला होता. सुकाणू समितीने दि.२९.०५.२०२३ रोजी झालेल्या बैठकीत लोटस को- ऑप स्पिनिंग मिल लि.इचलकरंजी, जि.कोल्हापूर या सूतगिरणीच्या १०:३०:६० या वित्तीय आकृतीबंधानुसार रु. ८०१९.११ कोटीच्या प्रकल्प अहवालास मान्यता दिली. सदर प्रकल्प अहवालास शासन निर्णय दिनांक ०८.०६.२०२३ अन्वये मान्यता दिली. दरम्यान या सूतगिरणीचा पूर्वीचा १०:३०:६० या अर्थसहाय्याच्या प्रमाणात शासन मान्यतेने ५:४५:५० असा बदल करण्यात येऊन दिनांक २७.६.२०२३ अन्वये शासन निर्णय निर्गमित केलेला असल्यामुळे सदर आकृतीबंधानुसार सदर सुतगिरणीच्या ८०९०.०० लाख या प्रकल्प अहवालच्या किंमतीनुसार सदर सूतगिरणीस शासन निर्णय दिनांक ८.६.२०२३ अन्वये मंजूरी दिलेल्या रुपये ८०१९.११ लाख इतक्या किंमतीच्या प्रकल्प अहवालात ५:४५:५० याप्रमाणे अर्थसहाय्याच्या प्रमाणात बदल करण्याची बाब शासन विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

लोटस को- ऑप स्पिनिंग मिल लि.इचलकरंजी, जि.कोल्हापूर या सूतगिरणीची सध्याची रु.६१७४.२४ लाख रक्कमेची प्रकल्प किंमत रु.८०९०.०० लाख किंमतीच्या मर्यादेत प्रो-रेटा नुसार रु.८०१९.११ लाख इतक्या रक्कमेच्या सुधारित प्रकल्प किंमतीस खालील अटींच्या अधीन राहून ५:४५:५० याप्रमाणे अर्थसहाय्याच्या प्रमाणात बदल करण्यास मान्यता देण्यात येत आहे : -

अ) सूतगिरणीने स्वतः उभारावयाचे सभासद भागभांडवल, शासनाकडून उपलब्ध झालेले भागभांडवल व प्रकल्प किंमतीच्या ५०% कर्जाची रक्कम पूर्णपणे खर्च झाल्याचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्यानंतरच सूतगिरणीस वाढीव प्रकल्प किंमतीनुसार देय असलेले शासकीय भागभांडवल मंजूर करण्यात येईल.

२. सदर सुतगिरणीवर खालील बाबी बंधनकारक राहतील.

१. सूतगिरणीच्या कामासाठी कालबध्द कार्यक्रम (Time bound Program) आखून घ्यावा व त्यानुसार सूतगिरणीची उभारणी विहित कालावधीत करावी.
२. शासन निर्णय दि.२४.३.१९९९ मधील सूतगिरणी परतफेडीस पात्र होण्याबाबतच्या अटीमध्ये दि.१०.०७.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली असून सदरची सुधारणा या सूतगिरणीसाठी बंधनकारक राहील.

३. सूतगिरणीस निधी उभा करण्यासाठी कोणती बँक कर्ज देणार आहे, त्या बँकेचे कर्ज मंजूर करण्यात येत असल्याबाबतचे पत्र सादर करावे.

४. सूतगिरणीच्या कामकाजावर व प्रकल्प उभारणीवर लक्ष देऊन त्याबाबतचा तिमाही प्रगती अहवाल आयुक्त वस्त्रोद्योग, नागपूर यांनी विहित विवरणपत्रात शासनास सादर करावा.

५. सूतगिरणीचा प्रकल्प एक पथदर्शक प्रकल्प म्हणून उभा राहील याबाबत सूतगिरणीने तसेच आयुक्त वस्त्रोद्योग,नागपूर यांनी दक्षता घ्यावी.

६. सदर सूतगिरणी सर्वसाधारण प्रवर्गातील असल्याने शासनाने भविष्यात काही अटी/शर्ती घातल्यास त्या या सूतगिरणीवर बंधनकारक असतील.

७. दि.१७ ऑक्टोबर, २०१६ रोजीच्या राजपत्रान्वये राज्यातील सहकारी संस्थांवर दोन शासकीय सदस्य नेमण्याच्या अनुषंगाने महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० मध्ये सुधारणा करण्यात आली असून सदर निर्णय या सूतगिरणीस बंधनकारक राहील.

३. या सूतगिरणीचे सभासद भागभांडवल व शासकीय भागभांडवल यांचे प्रमाण १:९ असे राहील. त्यानुसार सूतगिरणीने पुढीलप्रमाणे निधी उपलब्ध करावयाचा आहे.

| अ. क्र. | तपशिल | प्रकल्प किंमतीनुसार उभारावयाची रक्कम **(रू. लाखात)** |
|---|---|---|
| १ | सभासद भागभांडवल ५% | ४००.९६ |
| २ | शासकीय भागभांडवल ४५% | ३६०८.६० |
| ३ | दीर्घ मुदती कर्ज ५०% | ४००९.५५ |
| | **एकूण** | **८०१९.११** |

४. या सूतगिरणीचा प्रकल्प किंमतीचा बाबनिहाय तरतुदीचा तपशील खालीलप्रमाणे राहील व त्यामर्यादेत गिरणीने खर्च करणे बंधनकारक राहील.

**(रुपये लाखात)**

| अ.क्र. | तपशिल | मूळ प्रकल्प अहवालानुसार | दि.३०.६.२०११ रोजीच्या शासन निर्णयानुसार सुधारित प्रकल्प अहवाल किंमत | रू.८०९०.०० लाखाच्या प्रस्तावातील बाबनिहाय खर्च | प्रो-रेटा प्रमाणे गणना केलेली सुधारित रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | जमीन व जमीन सुधारणा | ५८.०६ | ५८.०६ | १७२.०० | **१७०.८१** |
| २ | मुख्य इमारत व बांधकाम | १२१५.३० | १२१५.३० | १९०८.३८ | **१८९१.७१** |
| ३ | प्लँट अँड मशिनरी | ३१०२.७८ | ३१०२.७८ | ४०६७.३० | **४०३२.००** |
| ४ | इतर कायम मालमत्ता | ८४५.०० | ८४५.०० | ९११.०० | **९०२.९५** |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ५ | स्टोअर्स व स्पेअर्स | ६१.०० | ६१.०० | ८८.८७ | **८८.२१** |
| ६ | मार्जीन मनी | २०८.१६ | २०८.१६ | ४११.१२ | **४०७.३७** |
| ७ | प्रिऑपरेटिव्ह खर्च | २७३.७७ | २७३.७७ | १८७.०० | **१८५.२५** |
| ८ | कॉन्टीजंसी | ४१०.१७ | ४१०.१७ | ३४४.३३ | **३४०.८१** |
| | **एकूण** | **६१७४.२४** | **६१७४.२४** | **८०९०.००** | **८०१९.११** |

५. सूतगिरणीने रु.८०१९.११ लाख इतक्या किंमतीमध्ये प्रकल्पाची उभारणी पूर्ण करावी. शासनाकडून देय भागभांडवलाची रक्कम निधीच्या उपलब्धतेप्रमाणे देण्यात येईल. प्रकल्प पूर्ण करण्यासाठी वरीलप्रमाणे त्या त्या प्रयोजनासाठी मंजूर किंमतीपेक्षा जास्त रक्कम खर्च झाल्यास जास्तीची रक्कम सूतगिरणीने स्वनिधीतून उभी करणे आवश्यक राहील. प्रकल्पावर अतिरिक्त होणारा खर्च सूतगिरणीला स्वत: करावा लागेल. तसेच यंत्रसामुग्री खरेदी व स्थापत्य बांधकामासाठी शासन निर्णय दि.१५.०६.२००६ व दि.२८.०३.२०१८ नुसार मान्यता घ्यावी. सूतगिरणीच्या संचालक मंडळाने सूतगिरणीच्या खर्चावर कडक नियंत्रण ठेवावे व अनावश्यक खर्च टाळावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०८२३१२०५३०७१०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

SURYAKA
NT G GOLE

Digitally signed by SURYAKANT G GOLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=807915039b19946107c26978f204a984f59902046b59aa4af1f7053ae69e9f74, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0A6F6D0FB5278051673FB4AB0DCFFE9098509649852FFED3A3EFF7F095B40AEA, cn=SURYAKANT G GOLE
Date: 2023.08.23 12:11:32 +05'30'

**( सुर्यकांत गोळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३. सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. आयुक्त, वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६. जिल्हाधिकारी, कोल्हापूर.
७. प्रादेशिक उप आयुक्त, वस्त्रोद्योग, सोलापूर.
८. जिल्हा उप निबंधक, सहकारी संस्था, कोल्हापूर.
९. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ, मुंबई-०१.
१०. कार्यासन अधिकारी १६-सी / १७-सी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रतीत).
१२. अध्यक्ष, श्री. लोटस को- ऑप स्पिनिंग मिल लि.इचलकरंजी, जि.कोल्हापूर.
१३. निवडनस्ती (टेक्स १ (अ)).